**सहायक सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशासकीय सेवा, गट- अ या पदावरील अधिकाऱ्याच्या महसुली विभाग वाटपातील बदलाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०२१/(प्र.क्र.२९/२१)/तांशि-१**

मंत्रालय विस्तार भवन,मादाम कामा रोड

हुतात्मा राजगुरु चौक,मुंबई - ४०० ०३२

दिनांक : २४ सप्टेंबर, २०२१

**संदर्भ**:-१. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना, दि.२८.०४.२०१५.

२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन आदेश क्र. ससेनि-२०२०/प्र.क्र.(९८/२०)/तांशि-१, दि.०७.०१.२०२१.

३. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना, दि.१४.०७.२०२१.

**शासन आदेश :**

संदर्भाधीन क्र.१ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५" मधील तरतूदीनुसार, संदर्भाधीन क्र. २ येथील शासन आदेशान्वये श्रीमती अम्रिता राजेंद्र कायगुडे यांची सरळसेवेने सहायक सचिव (तां), महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशासकीय सेवा, गट-अ या पदावर महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई येथे नियुक्ती करण्यात आली आहे. आता, श्रीमती कायगुडे यांनी केलेल्या विनंतीस अनुलक्षून व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने त्यांच्या सध्याच्या महसुली विभागात खालील विवरणपत्रातील स्तंभ-४ नुसार बदल करण्यात येत असून त्यांची पदस्थापना स्तंभ-५ मध्ये दर्शविल्यानुसार राहील.

| अ क्र | नाव, पदनाम व सध्या कार्यरत ठिकाण | सध्याचा महसुली विभाग | बदललेला महसुली विभाग | पदस्थापनेचे ठिकाण व पदनाम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती अम्रिता राजेंद्र कायगुडे, सहायक सचिव (तां), महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई | कोकण-२ | पुणे | सहायक सचिव (तां), महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, विभागीय कार्यालय, पुणे |

२. उपरोक्त अधिकाऱ्याच्या महसुली विभाग वाटपातील बदल व त्या अनुषंगाने करण्यात आलेली पदस्थापना ही संबंधितांच्या विनंतीनुसार करण्यात आली असल्याने, नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्यासाठी शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

३. उपरोक्त अधिकाऱ्यांनी कोणत्याही परिस्थितीत दि.३०.०९.२०२१ पूर्वी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई यांनी त्यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी.

४. या प्रकरणी रुजू होण्यास मुदतवाढ देण्याबाबतच्या कोणत्याही निवेदनाचा विचार केला जाणार नाही, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. उपरोक्त अधिकाऱ्याचा रुजू अहवाल संबंधित संस्थाप्रमुखांनी १५ दिवसांच्या आत संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत शासनास सादर करावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२४१५३०४८४७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2021.09.24 15:32:22 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत,**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ ,मुंबई.
५) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे.
६) महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, विभागीय कार्यालय, पुणे.
७) प्रधान सचिव,उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
९) निवडनस्ती- तांशि -१